**टंचाई कालावधीत ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.७३ /पापु-१४**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २७ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९
३) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्रमांक: मशा/कार्या-६/पाणी टंचाई/निधी मागणी, दिनांक १६ ऑक्टोबर, २०१८
४) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.७३/पापु-१४, दिनांक १६ ऑगस्ट, २०१८, दिनांक २७ ऑगस्ट, २०१८ व दिनांक २० ऑक्टोबर, २०१८, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१८
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग विभाग क्रमांक: एससीवाय-०८/२०१८/प्र.क्र.३८/म-११, दिनांक १३ ऑगस्ट, २०१८ व दिनांक १७ ऑक्टोबर, २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्रामीण व नागरी भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च “२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य” या लेखाशीर्षाखाली महसूल व वन विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. २०१७-१८ च्या तसेच त्यापूर्वीच्या टंचाई कालावधीत केलेल्या / करावयाच्या उपायोजनांसाठी संदर्भ क्र. ३ मधील पत्रान्वये निधी मागणीचा प्रस्ताव या विभागास प्राप्त झाला आहे. तसेच विभागाने शासन स्तरावरुन मान्यता दिलेल्या उपाययोजनांकरिता

निधी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. या विभागाकडे शिल्लक असलेल्या निधीमधून विभागीय आयुक्त, कोकण व औरंगाबाद यांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

ग्रामीण / नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार कोकण व औरंगाबाद या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या/राबविण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२४५ ००९३ **अंतर्गत रु. २५६.४२ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी छप्पन लाख आणि बेचाळीस हजार फक्त )** इतका निधी विभागीय आयुक्त, कोकण व औरंगाबाद यांना प्रचलित स्थायी शासन निर्णयामध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

### अटी व शर्ती

१) विभागीय आयुक्त, कोकण व औरंगाबाद यांनी सदर निधी संबंधीत जिल्हाधिका-यांना वितरीत करण्याची दक्षता घ्यावी. जिल्हाधिकारी, जालना यांनी सदर निधी प्राधान्याने विहिर अधिग्रहण या उपाययोजनेसाठी वितरीत करावा.

२) सन २०१७-१८ या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांकरीता तसेच या कालावधीतील प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा.

३) सदर निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account ) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरीत केला जाईल याची दक्षता घ्यावी.

४) ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात वितरीत केलेल्या निधीची ज्या जिल्हाधिका-यांकडून उपाययोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झालेली नाहीत, त्यांनी सन २०१६-१७ च्या वर्षात वितरीत केलेल्या निधीची संपूर्ण खर्चाची (१०० टक्के) **उपाययोगिता प्रमाणपत्रे तसेच सन २०१७-१८या आर्थिक वर्षात वितरीत केलेल्या निधीची किमान ७५ टक्के उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाली असल्याची खातरजमा झाल्यानंतरच संबंधित जिल्हाधिकारी यांना निधी वितरीत करण्यात यावा.**

५) शासन परिपत्रक, वित्त विभाग दि. १८.०४.२०१७ व ३०.०४.२०१७ मधील अटींची पुर्तता ज्या जिल्हयांकडून पूर्ण झाली आहे. त्याच जिल्हयांना निधी वितरीत करण्यात यावा.

६) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

७) ज्या नागरी तथा ग्रामीण उपाययोजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत आहेत, त्या उपाययोजनांसाठीचा निधी जिल्हा परिषदेकडे वितरीत करण्यात येऊ नये. सदर निधी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी योजना राबविणाऱ्या संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचेकडे तात्काळ वितरीत करावा. तसेच ज्या उपाययोजना महानगरपालिका / नगरपरिषद यांचे मार्फत राबविण्यात येत आहेत, त्याचेकरिता जिल्हाधिकाऱ्यांनी सदर निधी संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपरिषद यांचेकडे वितरीत करावा.

८) यापुढे टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे याबाबत बाब निहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादि बाबतची माहिती, तसेच त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावीत. त्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार याची नोंद घेण्यात यावी.

९) सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी वितरीत करण्यात आला आहे, त्यामधून देयके अदा करताना खाजगी टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या अनुज्ञेय ठरणार नाहीत. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांसाठी निधी वितरीत करण्यात येऊ नये.

१०) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी

करुन त्याबाबतचे विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच **कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही** याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

११) सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे.तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करून बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

१२) **याबाबतचा खर्च या शासन निर्णयातील निधी वितरण बाबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे "मागणी क्र. सी-६, २२४५ -नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९१)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५ ००९३) (दत्तमत)(वेतनेत्तर) ३१, सहायक अनुदाने" या उपलेखाशीर्षां उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

१३) आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून/ उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी संबंधीत विभागीय आयुक्तांनी खाली नमुद केल्यानुसार संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना वितरीत करावा.

| **अ.क्र.** | **विभाग** | **जिल्हा** | **एकूण (रक्कम रु. लाखात)** |
|---|---|---|---|
| १ | कोकण | पालघर | १५७.२० |
| २ | औरंगाबाद | जालना | ९९.२२ |
| **एकूण** | | | **२५६.४२** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१११४१२३४३६९१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R. B. Kumatgi

Digitally signed by R. B. Kumatgi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96d578360190574be078f90f44cde8446df6e461003bf3672f18f9dbab1603da, cn=R. B. Kumatgi
Date: 2018.11.28 11:30:55 +05'30'

**( राजेंद्र कुमटगी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, महसूल (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्रार्धिकरण, मुंबई,
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, कोकण, औरंगाबाद
९. जिल्हाधिकारी, पालघर, जालना
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर, जालना
११. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर /जालना
१२. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जालना
१३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१४. उप सचिव / पापु-१४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
१५. पापु-१४ संग्रहासाठी.